राज्यातील लॉकडाऊन परिस्थितीमध्ये अतिरिक्त होणाऱ्या दूधाचे दूधभुकटीमध्ये रुपांतरण योजनेकरिता आकस्मिकता निधी वितरीत करणेबाबत....

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ जुलै, २०२०.

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८, दिनांक ३ एप्रिल, २०२०.
२) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८, दिनांक २७ एप्रिल, २०२०.
३) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८, दिनांक १२ मे, २०२०
४) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८, दिनांक २९ जून, २०२०
५) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र.१/पदुम-८, दिनांक ९ जुलै, २०२०

प्रस्तावना :-

शासनाने संदर्भाधीन क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या (महानंद) या सहकारी दूध संघाच्या शिखर संस्थेमार्फत, राज्यातील अतिरिक्त होणाऱ्या प्रतिदिन १० लक्ष लिटर दूधाचे रुपांतरण दूधभुकटीत करण्याबाबतची योजना घोषित केली आहे. सदर योजनेस संदर्भ क्र. ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३१ जुलै, २०२० रोजीपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत वित्त विभागाने यापूर्वी आकस्मिकता निधीद्वारे उपलब्ध करुन दिलेला रु.५०.०० कोटी इतका निधी संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये अंमलबजावणी यंत्रणेस निधी वितरीत करण्यात आला आहे.

या योजनेंतर्गत दिनांक ८/५/२०२० रोजीनंतर झालेली दूध स्विकृती व त्यासाठी प्रतिपूर्तीच्या स्वरुपात खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाने पुनश्च: रु.५०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिलेला असून सदर निधी अंमलबजावणी यंत्रणेस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

शासन या निर्णयान्वये, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ (महानंद) यांना सदर योजनेंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु.१९०.०० कोटी निधीपैकी अतिरिक्त रु.५०.०० कोटी इतका निधी, स्विकृत झालेल्या अतिरिक्त दूधाच्या विनियोजनावरील खर्च भागविण्याकरिता वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी महाराष्ट्र आकस्मिकता निधी नियम ६.८ आणि १२ अन्वये कार्यवाही करावी. तसेच नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी शासन परिपत्रक क्रमांक सीएनएफ-१०८६/१५३/अर्थसंकल्प-३,

दिनांक २८.८.१९८६ च्या परिच्छेद २ (१) मध्ये दर्शविलेल्या सूचनांचे आणि खालील निर्देशांचे अनुपालन करावे :-

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, मुंबई यांनी आकस्मिकता निधीतून खर्च करताना सादर करण्यात येणाऱ्या देयकात आकस्मिकता निधी अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि-२०२०/प्र.क्र.५/अर्थ-१५, दिनांक २४.७.२०२० अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे व त्यास लाल शाईने अधोरेखित करावे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, मुंबई यांनी आकस्मिकता निधीतून मंजूर केलेली रक्कम दिनांक २ ऑगस्ट पर्यंत पूर्णत: खर्च होईल याची दक्षता घ्यावी.
३. आकस्मिकता निधीद्वारे मंजूर केलेल्या रक्कमांच्या खर्चाचा हिशोब वेगळा ठेवून, त्यासंबंधीचा मासिक खर्चाचा प्रगती अहवाल या विभागास तसेच वित्त विभाग आणि महालेखापाल यांना सादर करण्यात यावा.
४. देयकासोबत जोडण्यात येणाऱ्या स्लिपमध्ये मुख्य लेखाशीर्ष/गौण लेखाशीर्ष संगणक सांकेतांक इत्यादीचा उल्लेख करावा.
५. आहरण व संवितरण अधिकारी यांनी आकस्मिकता निधीची देयके सादर करताना आकस्मिकता निधी सांकेतांक क्र. ८०००७६६३ असा नमूद करावा.
६. आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेले अग्रिम ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१६/व्यय-२ दिनांक २४/७/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७२८१४२६२३०१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.07.28 14:30:56 +05'30'

**( राजेश गोविल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई.
१०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या, मुंबई.
११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता व लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
१२.अधिदान व लेखाधिकारी, बांद्रा, मुंबई.
१३.निवासी व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१४.सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६.वित्त विभाग( व्यय-२, अर्थसंकल्प-१५), मंत्रालय, मुंबई.
१७.कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई.
१८. निवडनस्ती, पदुम-८